**सरकारी वकील कार्यालय, अपील शाखा (रिट सेल), मा.उच्च न्यायालय, मुंबई, सरकारी वकीलांचे कार्यालय, मूळ शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई व सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ या कार्यालयांतील सरकारी वकीलांकरिता आयपॅड तसेच त्याकरिता आवश्यक पेन्सिल व कव्हर खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संप्रिसा- २०२४/प्र. क्र.१०/का. ७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक : २१ एप्रिल, २०२५.**

**संदर्भ:-** १) सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय अपील शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. आस्था/रिटसेल/१९१३०/२०२४, दिनांक १७.१२.२०२४.

२) सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय मुळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. लेखा/२८/(UA), दिनांक १४.०१.२०२५.

३) सहसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, शाखा छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.आस्था-२०२५/प्र.क्र.०४/५१०, दि.०३.०४.२०२५.

४) विभागाच्या दिनांक ०७/०४/२०२५ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र. क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७ व शासन निर्णय क्र. भाखंस २०१७/प्र. क्र.२०४/उद्योग-४, दि.०८.१२.२०१७.

**प्रस्तावना :-**

विधि व न्याय विभागातील ई शाखेचे शासन परिपत्रक दिनांक २०/१२/२०२१ व कार्यासन १४ चे दिनांक २३/१२/२०२१ शासन परिपत्रक तसेच मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक ०७.११.२०२३ व २०.०२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये व मा. महाधिवक्ता यांनी दि.२६.११.२०२४ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सूचनेनुसार, ई-फायलींग यंत्रणा परिणामकारकरित्या राबविण्यासाठी शासनामार्फत दाखल करण्यात येणारी सर्व प्रकरणे/याचिका ई-फायलिंग

प्रणालीद्वारे संबंधित सरकारी अभियोक्ता यांचेमार्फत दाखल करणे बंधनकारक करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन सरकारी अभियोक्तांना लॅपटॉप्स/आयपॅड तात्काळ उपलब्ध करुन देण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. याकरिता सरकारी वकीलांना लॅपटॉप/आयपॅड खरेदीचा प्रस्ताव Gem पोर्टवरील तांत्रिक स्पेसिफिकेशनसह सादर करण्याबाबत सरकारी वकील कार्यालय, रिट सेल/मूळ शाखा/उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद/नागपूर यांच्याकडून शासन पत्र दि.०५.१२.२०२४ अन्वये परिपूर्ण प्रस्ताव मागविण्यात आले आहेत.

त्यानुसार सरकारी वकील कार्यालय, अपील शाखा (रिट सेल), मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भ क्र.०१ येथील दि.१७.१२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये , सरकारी वकीलांचे कार्यालय, मूळ शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी संदर्भ क्र.०२ येथील दि.१४.०१.२०२५ रोजीच्या पत्रान्वये व सहसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई शाखा छत्रपती संभाजीनगर यांनी संदर्भ क्र.०३ येथील ०३.०४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ या कार्यालयांतील सरकारी वकीलांना ई फायलिंग यंत्रणा सुरळीतपणे राबविण्याकरिता आयपॅड व त्याकरिता पेन्सिल व कव्हर खरेदीचे प्रस्ताव शासनास सादर केले आहेत.

सदर प्रस्तावांना संदर्भ क्र. ४ अन्वये विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक ०७.०४.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली. यानुषंगाने सरकारी वकील कार्यालय, अपील शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई, सरकारी वकीलांचे कार्यालय, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई व सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ कार्यालयातील सरकारी वकीलांकरिता आयपॅड तसेच त्याकरिता पेन्सिल व कव्हर खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सरकारी वकील कार्यालय, अपील शाखा (रिट सेल), मा.उच्च न्यायालय, मुंबई या कार्यालयातील ६१ सरकारी वकीलांकरिता आयपॅड तसेच त्याकरिता आवश्यक पेन्सिल व कव्हर खरेदी करण्यास रु.५५,५८,३००/-(अक्षरी रुपये पंचावन्न लक्ष अठ्ठावण्ण हजार तिनशे फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास, सरकारी वकीलांचे कार्यालय, मूळ शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई या कार्यालयातील ३७ सरकारी वकीलांकरिता आयपॅड तसेच त्याकरिता आवश्यक पेन्सिल व कव्हर खरेदी करण्यास रु.३३,९१,१००/- (अक्षरी रुपये तेहत्तीस लक्ष एक्याण्णव हजार शंभर फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास व सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ या कार्यालयातील ७३ सरकारी वकीलांकरिता आयपॅड तसेच त्याकरिता

आवश्यक पेन्सिल व कव्हर खरेदी करण्यास रु.६६,४१,९००/- (अक्षरी रुपये सहासष्ठ लक्ष एक्केचाळीस हजार नऊशे फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास अशा तिन्ही कार्यालयांच्या आयपॅड तसेच त्याकरिता आवश्यक पेन्सिल व कव्हर खरेदी करण्याच्या एकूण रु. १,५५,९१,३००/- (अक्षरी रुपये एक कोटी पंच्चावन्न लक्ष एक्याण्णव हजार तिनशे फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तिन्ही कार्यालयांकरिता आयपॅड तसेच त्याकरिता आवश्यक पेन्सिल व कव्हर खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

**१) सरकारी वकीलांचे कार्यालय, अपील शाखा (रिट सेल),मा.उच्च न्यायालय, मुंबई**

| अ. क्र. | संगणक सामग्री | नग | दर | एकूण रु. |
|---|---|---|---|---|
| 1. | Apple iPad Pro (11 inch, 512 GB) | 1 | 1,19,900/- | **1,19,900/-** |
| | Apple Pencil Pro | 1 | 11,900/- | **11,900/-** |
| | Smart Folio for iPad Pro 11 inch (M4) Cover | 1 | 8500/- | **8500/-** |
| 2. | Apple iPad Air (11 inch, 256 GB) | 60 | 69,900/- | **41,94,000/-** |
| | Apple Pencil Pro | 60 | 11,900/- | **7,14,000/-** |
| | Smart Folio for iPad Pro 11 inch (M2) Cover | 60 | 8,500/- | **5,10,000/-** |
| | | | **एकूण** | **रु.55,58,300/-** |

**२) सरकारी वकीलांचे कार्यालय, मूळ शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई**

| अ. क्र. | संगणक सामग्री | नग | दर | एकूण रु. |
|---|---|---|---|---|
| 1. | Apple iPad Pro (11 inch, 512 GB) | 1 | 1,19,900/- | **1,19,900/-** |
| | Apple Pencil Pro | 1 | 11,900/- | **11,900/-** |
| | Smart Folio for iPad Pro 11 inch (M2) Cover | 1 | 8500/- | **8500/-** |
| 2. | Apple iPad Air (11 inch, 256 GB) | 36 | 69,900/- | **25,16,400/-** |
| | Apple Pencil Pro | 36 | 11,900/- | **4,28,400/-** |
| | Smart Folio for iPad Pro 11 inch (M2) Cover | 36 | 8,500/- | **3,06,000/-** |
| | | | **एकूण** | **रु.33,91,100/-** |

### ३) सरकारी वकीलांचे कार्यालय, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ

| अ.क्र. | संगणक सामग्री | नग | दर | एकूण रु. |
|---|---|---|---|---|
| 1. | Apple iPad Pro Wi-fi (11 inch, 512 GB, 4th Genretion) | 1 | 1,19,900/- | **1,19,900/-** |
| 2. | Apple iPad Air Wi-fi (11 inch, 256 GB) | 72 | 69,900/- | **50,32,800/-** |
| 3. | Apple Pencil Pro | 73 | 11,900/- | **8,68,700/-** |
| 4. | Smart Folio for iPad Pro 11 inch | 73 | 8,500/- | **6,20,500/-** |
| | | | **एकूण** | **रु.66,41,900/-** |

३. सदर आयपॅड तसेच त्याकरिता पेन्सिल व कव्हर खरेदी ही संदर्भ क्र.०५ येथील उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM पोर्टलवरुन शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या संदर्भ क्र.०४ येथील दि.०७.०४.२०२५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या निर्देशानुसार उपरोक्त तिन्ही कार्यालयांची आयपॅड तसेच त्याकरिता पेन्सिल व कव्हरची खरेदी सरकारी वकील कार्यालय, अपील शाखा (रिट सेल), मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी Gem Portal वर Customize Bid टाकून एकत्रित खरेदी करावी.

५. सदर आयपॅड वापरकर्त्यांना पुरवताना आयपॅड जबाबदारीने वापरण्याचे तसेच आयपॅड गहाळ झाल्यास तसेच वापरकर्त्यांला कोणत्याही कारणास्तव (प्रतिनियुक्ती, बदली, सेवासमाप्ती) कार्यमुक्त केल्यास आयपॅड जमा करण्याबाबत, यांसारख्या त्याचप्रमाणे आयपॅडच्या अनुषंगाने सविस्तर सूचना अटी/शर्ती सरकारी वकील, कार्यालय यांच्यामार्फत निर्गमित करण्यात याव्यात.

६. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२११२४९१३८९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA RAMCHANDRA JADHAV

Digitally signed by MAHENDRA RAMCHANDRA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=3971ec243f15cd8a25bfd6dbaf74efe04f80d57c22e473eb8eaac7ac344ac25a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=846337C71F3B3405F8D8448578B4ED3DDBE6ED2DB306E26977B3CDCCDDC27F14, cn=MAHENDRA RAMCHANDRA JADHAV
Date: 2025.04.21 12:50:15 +05'30'

**( महेंद्र जाधव )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. मा. महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. सरकारी वकील कार्यालय, अपील शाखा (रिट सेल), उच्च न्यायालय, मुंबई.
१०. सरकारी वकीलांचे कार्यालय, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
११. सरकारी वकीलांचे कार्यालय,उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद.
१२. सहसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय मुंबई, शाखा छत्रपती संभाजीनगर.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
१४. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१५. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१३, २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती/का. ७.